“मानव विकास कार्यक्रम” अंतर्गत ग्रामीण महिलांना आर्थिक सहाय्य करण्यासाठी “तेजश्री फायनान्शियल्स सर्व्हीसेस (Tejashree Financial Services)” या “नवीन उपक्रम”साठी “महिला आर्थिक विकास महामंडळ (MAVIM), मुंबई” यांना निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: माविका-२०१८/प्र.क्र.६२/का.१४१८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- २९ मार्च, २०२३.

**वाचा:**

१. नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.माविमि-२०१०/प्र.क्र.८१/का.१४१८, दि.१९.०७.२०११.
२. नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.माविका-२०१८/प्र.क्र.६२/का.१४१८, दि.०१.०२.२०१९, दि.३०.०३.२०१९, दि.२७.१०.२०२१, दि.२१.०२.२०२२.

**शासन निर्णय:**

नियोजन विभागाचे संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये आर्थिक वर्ष सन २०११-१२ पासून “मानव विकास कार्यक्रम” अंतर्गत राज्यातील २३ जिल्ह्यातील १२५ तालुक्यांत “आरोग्य, शिक्षण व उत्पन्न वाढ” या क्षेत्रांशी संबंधित विविध लोकहिताच्या योजना राबविण्यात येत आहेत.

२. नियोजन विभागाचे संदर्भ क्र.२ येथील दि. ०१.०२.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये “मानव विकास कार्यक्रम” अंतर्गत “तेजश्री फायनान्शियल सर्व्हीसेस (Tejashree Financial Services)” हा नवीन उपक्रम “महिला आर्थिक विकास महामंडळ (MAVIM), मुंबई” मार्फत राबविण्यास तसेच त्यांना एकूण रु.६८.५३ कोटी इतका निधी ३ आर्थिक वर्षात उपलब्ध करुन देण्याबाबत मान्यता देण्यात आलेली आहे. त्यानुसार “महिला आर्थिक विकास महामंडळ, (MAVIM) मुंबई” यांना उपरोक्त निधीपैकी पहिल्या टप्प्यात आर्थिक वर्ष सन २०१८-१९ साठी देय असलेल्या रु.४१,८३,००,०००/- ( अक्षरी रु.एकेचाळीस कोटी त्र्याऐंशी लक्ष फक्त) इतक्या निधीपैकी रु.३१,०३,२९,७६४/- (अक्षरी रु.एकतीस कोटी तीन लक्ष एकोणतीस हजार सातशे चौसष्ट फक्त) इतका निधी “आयुक्त,मानव विकास” यांना “व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ (MAVIM), मुंबई” यांना उपलब्ध करुन देण्यासाठी नियोजन विभागाच्या दि.३०.०३.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. तसेच, दि. २७.१०.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये रु.२४,००,००,०००/- (अक्षरी रुपये चोवीस कोटी फक्त) इतका निधी “आयुक्त,मानव विकास” यांना “व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ (MAVIM), मुंबई” यांना उपलब्ध करुन देण्यासाठी वितरीत करण्यात आला असून या

उपक्रमाचे प्रथम वर्ष सन २०२०-२०२१ असे गृहीत धरुन आर्थिक वर्ष सन २०२२-२३ पर्यंत या तीन आर्थिक वर्षाच्या कालावधीत सदरील उपक्रम राबविण्यास शासन मान्यता देण्यात आली आहे.

३. नियोजन विभागाच्या "मानव विकास कार्यक्रम" अंतर्गत "मागणी क्रमांक ओ-१, २०५३ जिल्हा प्रशासन, ०९३ जिल्हा आस्थापना, पंचवार्षिक योजनाअंतर्गत योजना, ०४ आयुक्त, औरंगाबाद, (०४) (०१) मानव विकास निर्देशांक वृद्धी करणे (२०५३१२३१), ३१-सहायक अनुदाने वेतनेतर" या लेखाशीर्षाखाली"तेजश्री फायनान्शियल सर्व्हीसेस" (Tejashree Financial Services) हा उपक्रम राबविण्यासाठी झालेल्या "सामंजस्य करार"(MoU) अनुसार उपलब्ध करुन द्यावयाच्या एकूण रु. ६८.५३ कोटी निधीपैकी पहिल्या टप्प्यात रु.३१,०३,२९,७६४/- (रु.एकतीस कोटी तीन लक्ष एकोणतीस हजार सातशे चौसष्ट फक्त) इतका निधी आर्थिक वर्ष सन २०१८-१९ मध्ये तसेच दुसऱ्या व तिसऱ्या टप्प्यात अनुक्रमे रु.२४,००,००,०००/-(अक्षरी रु.चोवीस कोटी फक्त) आणि रु. ५,५०,००,०००/-(अक्षरी रु.पाच कोटी पन्नास लक्ष फक्त) इतका निधी अनुक्रमे दि.२७.१०.२०२१ व दि.२१.०२.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये सन २०२१-२२ मध्ये उपलब्ध करुन देण्यात आला आहे.

४. नियोजन विभागाच्या सदर शासन निर्णयान्वये "महिला आर्थिक विकास महामंडळ (MAVIM), मुंबई" यांना देय असलेला उर्वरित रु. ७,९९,७०,२३६/- इतका अंतिम टप्प्यातील निधी उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात येत आहे. त्यानुसार "मानव विकास कार्यक्रम" सन २०२२-२३ अंतर्गत "मागणी क्रमांक ओ-१, २०५३ जिल्हा प्रशासन, ०९३ जिल्हा आस्थापना, पंचवार्षिक योजनाअंर्तगत योजना, ०४ आयुक्त,औरंगाबाद (०४) (०१) मानव विकास निर्देशांक वृध्दी करणे (२०५३१२३१), ३१- सहाय्यक अनुदान वेतनेतर" या लेखाशिर्षाखाली रु. ७,९९,७०,२३६/- (रु.सात कोटी नव्याण्णव लक्ष सत्तर हजार दोनशे छत्तीस फक्त) इतका निधी "आयुक्त, मानव विकास" यांना वितरीत करण्यात येत आहे. "आयुक्त, मानव विकास" यांनी सदरहू रु. ७,९९,७०,२३६/- (रु. सात कोटी नव्याण्णव लक्ष सत्तर हजार दोनशे छत्तीस फक्त) इतका निधी आहरित करावा व "उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ (MAVIM), मुंबई" यांना उपलब्ध करुन द्यावा.

५. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर हा शासन निर्णय उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०३२९१८५३५९४०१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJEEV HARISHCHANDRA DHURI

Digitally signed by SANJEEV HARISHCHANDRA DHURI
Date: 2023.03.29 20:10:26 +05'30'

**(सं.ह.धुरी)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:**

१. प्रधान महालेखापाल, लेखा परीक्षा / लेखा अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.

२. आयुक्त (मानव विकास) , मानव विकास आयुक्तालय, छत्रपती संभाजीनगर.
३. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ (MAVIM) मुंबई.
४. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, छत्रपती संभाजीनगर..
५. निवड नस्ती.